**मंत्रिमंडळाच्या बैठका आणि मुख्यमंत्र्यांच्या अध्यक्षतेखालील बैठकांना उपस्थितीबाबत सचिवांनी घ्यावयाची दक्षता**

---

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
शासन परिपत्रक क्रमांक : मुसका २०१०/४९९/का.१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १६ सप्टेंबर,२०१०

# परिपत्रक

(अ) **मंत्रिमंडळ बैठकांसाठी उपस्थिती** :- शासन कार्य नियमावलीनुसार मंत्रिमंडळ बैठकांना खात्याच्या सचिवांची उपस्थिती अनिवार्य आहे, सचिवांच्या ऐवजी इतर अधिकाऱ्यांना उपस्थित राहता येत नाही. याबाबत पूर्वी विभागीय सचिवांना सूचनाही देण्यात आलेल्या आहेत. तरीही असे आढळून आले आहे की, मंत्रिमंडळ बैठकांना काही सचिव त्यांच्याबरोबर इतर अधिकाऱ्यांना घेवून येतात. मा.मुख्यमंत्र्यांनीही याबाबत नापसंती दर्शविलेली आहे. सचिवांव्यतिरिक्त इतर अधिकाऱ्यांना मंत्रिमंडळ बैठकीबाहेर जाण्याविषयी मुख्य सचिव कार्यालयातील अधिकारी / कर्मचाऱ्यांकडून सूचित केल्यावरही संबंधित अधिकारी किंवा त्यांचे सचिव याकडे दुर्लक्ष करतात, असे गत महिनाभरात एका विशिष्ट मंत्रालयीन विभागाबाबत दिसून आले आहे. हे अत्यंत आक्षेपार्ह आहे. यापुढे मंत्रिमंडळ बैठकीस खात्याच्या सचिवांनी इतर अधिकाऱ्यांना न आणण्याबाबतची दक्षता घ्यावी. अपवादात्मक स्थितीत (उदा. सादरीकरणामध्ये किंवा अत्यंत तांत्रिक स्वरुपाच्या विषयांमध्ये मदत हवी असल्यास) सचिवांना त्यांच्या व्यतिरिक्त कोणा अधिकाऱ्याची मदत व उपस्थिती आवश्यक असल्यास त्यासाठी **मुख्य सचिवांची पूर्व मान्यता** घेण्याची व असा अधिकारी खातेप्रमुखासारखा ज्येष्ठ अधिकारी असेल, याची विभागीय सचिवांनी दक्षता घ्यावी. **शासन कार्य नियमावलीतील तरतुदींच्या अंमलबजावणीसाठी विभागांचे सचिव वैयक्तिकरित्या जबाबदार आहेत, याचा पुनरुच्चार करण्यात येत आहे. यापुढे सचिवांव्यतिरिक्त इतर कोणी अधिकारी मंत्रिमंडळ बैठकीत, मुख्य सचिवांच्या पूर्व परवानगीशिवाय उपस्थित राहिल्यास, सदर अधिकारी शिस्तभंग कारवाईस पात्र राहील.** त्याशिवाय संबंधित विभागीय सचिवही जबाबदार राहतील.

तसेच दिनांक २०/११/२००९ व ७/१/२०१० च्या टिप्पणीमध्ये आदेशित केल्यानुसार, विषयाशी संबंधित विभागाच्या सचिवांनी केवळ त्यांच्या विषयावरील चर्चेच्या वेळी बैठकीत उपस्थित रहावे, विषय चर्चेस येईपर्यंत मंत्रिमंडळ दालनाशेजारील दालनामध्ये उपस्थित रहावे. तसेच कायम निमंत्रित सचिवांव्यतिरिक्त कोणत्याही वेळी केवळ दोन सचिवांनी (चर्चा सुरु असलेल्या विषयाचे व त्यापुढील विषयाचे सचिव) बैठकीत उपस्थित रहावे अशाही सूचना देण्यात आलेल्या आहेत. त्याबाबतही सचिवांनी दक्षता घ्यावी.

मंत्रिमंडळ बैठक झाल्यानंतर विभागीय सचिवांनी तात्काळ (एका तासाभरात) प्रारुप इतिवृत्त त्यांच्या स्वाक्षरीने मुख्य सचिवांकडे सादर करणे आवश्यक असूनही ते लगेच सादर केले जात नाही. मुख्य सचिव कार्यालयाने पाठपुरावा केल्यानंतर उशीरा अथवा उप सचिवांच्या सहीने ते पाठविले जाते, तसेच प्रारुप इतिवृत्त काळजीपूर्वक तयार केले जात नाही, असेही निदर्शनास आले आहे. याबाबतही मंत्रिमंडळ बैठकीतील निर्णयांनुसार **नेमके** प्रारुप इतिवृत्त **त्वरित** मुख्य सचिव कार्यालयात सादर करण्याची विभागीय सचिवांनी दक्षता घ्यावी. शासन कार्य नियमावलीनुसार **ही जबाबदारी सुध्दा सचिवांची वैयक्तिक जबाबदारी आहे**, हे निदर्शनास आणण्यात येत आहे.

(ब) **मुख्यमंत्र्यांकडील बैठकांना सचिवांची उपस्थिती** :- मा.मुख्यमंत्र्यांच्या अध्यक्षतेखाली होणाऱ्या बैठकांना विषयाशी संबंधित खात्याच्या सचिवांनीच उपस्थित राहणे अपेक्षित व आवश्यक आहे. याबाबत मुख्यमंत्री सचिवालयाने दिनांक १०/०२/२००६ व २६/०२/२०१० च्या पत्राद्वारे (प्रती संलग्न) विनिर्दिष्ट सूचना दिल्या आहेत. तरीही मुख्यमंत्र्यांकडील बैठकांना सचिवांऐवजी किंवा सचिवांबरोबर कनिष्ठ अधिकारी उपस्थित राहतात, असे आढळले आहे. याबाबतही विभागीय सचिवांनी दक्षता घेवून मुख्यमंत्र्यांकडील बैठकांना स्वत: उपस्थित राहावे, कनिष्ठ अधिकाऱ्यांना सोबत नेवू नये / पाठवू नये, व अपवादात्मक बाब म्हणून अपरिहार्य स्थितीत सचिवांऐवजी / व्यतिरिक्त इतर अधिकाऱ्यांची उपस्थिती आवश्यक असल्यास, मुख्यमंत्री सचिवालयाच्या पूर्व परवानगीने, इतर वरिष्ठ अधिकाऱ्याने उपस्थित राहावे, व असा अधिकारी पुरेसा वरिष्ठ (खातेप्रमुख, सह सचिव इत्यादी) असेल याचीही दक्षता घ्यावी. या सूचनांचे उल्लंघन झाल्यास संबंधित अधिकारी, कारवाईस पात्र राहील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००९१६१८४४५१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( जे. पी. डांगे )**
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,**
**मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव व सचिव,**
**मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,**
**महासंचालक, माहिती व जनसंपर्क**